रस्ता सुरक्षा निधीमधून करावयाच्या खर्चाच्या प्रस्तावाबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एमव्हीआर-०८१७/प्र.क्र.४०१/परि-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ मार्च, २०२२.

संदर्भ :- १) शासन पत्रे समक्रमांक दि.१२.०५.२०२१, दि.२६.०७.२०२१ व २२.१२.२०२१ रोजीचे इतिवृत्त.
२) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि. ०१ सप्टेंबर, २०१६.
३) शासन अधिसूचना क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि. १७ ऑक्टोबर, २०१६.

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.२९५/२०१५ यामध्ये रस्ता सुरक्षा विषयक बाबींचा वेळोवेळी आढावा घेऊन मा.सर्वोच्च न्यायालयास अहवाल सादर करण्यासाठी रस्ता सुरक्षा समितीची स्थापना केली आहे. सदर समितीने रस्ता सुरक्षाविषयक कामकाजासाठी स्वतंत्रपणे रस्ता सुरक्षा निधी निर्माण करण्याचे आदेश दिलेले आहेत. त्यानुसार रस्ता सुरक्षासंदर्भात विविध प्रकल्पांना मान्यता देण्याकरीता संदर्भाधिन क्र. २ येथील दि.०१.०९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये "रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समिती" स्थापित करण्यात आलेली आहे. उक्त प्रयोजनासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१५.०४.२०२१ व दि.१२.०५.२०२१ रोजी बैठक होवून सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भाधिन क्र.१ येथील दि.१२.०५.२०२१,दि.२६.०७.२०२१ व दि.२२.१२.२०२१ च्या पत्रान्वये निर्गमित केले आहे. उक्त बैठकीतील मान्यता दिलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या रस्ता सुरक्षा समितीने दिलेल्या निर्देशानुसार रस्ता सुरक्षा संदर्भात विविध प्रस्तावांना मान्यता देण्याकरीता मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली "रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समिती" स्थापित करण्यात आलेली आहे. उक्त समितीने रु.८५,४६,२३,०००/-(रू.पंच्याऐशी कोटी शेहेचाळीस लक्ष तेवीस हजार मात्र) इतक्या रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास मान्यता दिलेली आहे.

१. प्रस्तावावरील बाबनिहाय खर्चाचे तपशिलवार विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | विभागाचे नाव | प्रस्ताव | खर्च (रु.लक्ष) |
|---|---|---|---|
| १ | अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई | १९४ इंटरसेप्टर वाहने खरेदी | २०,००.०० |
| २ | अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य , मुंबई | पोलीस आपत्कालीन प्रतिसाद वाहने खरेदी | ५,००.०० |
| ३ | सार्वजनिक आरोग्य विभाग | १) ट्रॉमाकेअर सेंटरकरीता उपकरणे | २०,४६.२३ |
| | | २) अतिजोखमीच्या ८ जिल्ह्यांसाठी ३९ ALS रुग्णवाहिका | |
| ४ | महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ | इंटेलिजेंट ट्रॅफिक मॅनेजमेंट सिस्टीम (ITMS) (रु.११५.२३ कोटीच्या रकमेसाठी रु.४०.०० कोटी इतक्या मर्यादेत व्यवहार्यता तफावत निधी (Viability Gap Fund) ) | ४०,००.०० |
| | | **एकूण** | **८५४६.२३** |

२. उपरोक्तप्रमाणे मान्यता दिलेल्या प्रस्तावांशी संबधित विभागाने शासनाने विहित केलेल्या नियम कार्यपध्दती/धोरणानुसार खरेदीप्रक्रिया राबविण्याची जबाबदारी संबधित विभागाची राहील.

३. संबधित विभागांनी मान्यता दिलेल्या सामग्रीशी संबधित देयके अदा करण्याकरीता विहित कार्यपध्दतीनुसार बाबनिहाय /तपशिलवार विवरणपत्रासह प्रमाणित करुन परिवहन आयुक्त कार्यालयाकडे निधी वितरणाचे प्रस्ताव सादर करावेत.

४. वरीलप्रमाणे प्राप्त झालेल्या प्रस्तावाची वित्तीय बाबी तपासून, छाननी करुन संबधित विभागास/ प्राधिकरणास निधी उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांची राहील.

५. उपरोक्तप्रमाणे मान्य केलेल्या प्रस्तावावरील खर्च रस्ता सुरक्षा निधीच्या प्रयोजनासाठी भारतीय रिझर्व्ह बँक मुंबई येथे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे नावे उघडण्यात आलेल्या स्वियं प्रपंजी लेखा खाते (PLA A/c) क्र. ०१५१४८०१०४१ कोड नंबर २१६७ यामधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०४१३१५५२१६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhikan Onkar Thakur

Digitally signed by Bhikan Onkar Thakur
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cb64a92ffb1a1fc675b87b99d133c8e4ffed848f8ec9727d5082eb07dbbe3343, pseudonym=275A9F330CC9FDA3AC47ABC11C0D5C541DE78A2F, serialNumber=2CF77A3A2916BE200D3D9A0961DF4F9F77CC14E167C7FCEC2EA903E779A2239A, cn=Bhikan Onkar Thakur
Date: 2022.03.04 13:17:44 +05'30'

**( भि. ओं. ठाकूर )**

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
४. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७. मा. उपसभापती,विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
९. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
१०.मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.अपर मुख्य सचिव (गृह) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१७.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
२०.वित्त विभाग (व्यय ८/कोषा ५/ अर्थसंकल्प १०) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२१.गृह विभाग (बीयुडी १/बीयुडी २/परिवहन ४) मंत्रालय, मुंबई.
२२.निवडनस्ती/परि- २.